**वन विभागाकडील नाशिक येथील मौजे पाथर्डी कक्ष क्रमांक २२५ (सर्व्हे नंबर २८४, २८६ ) एकूण क्षेत्र ९३.९६७ हेक्टर वनक्षेत्र महाराष्ट्र वन विकास महामंडळास हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: बैठक-२०१५/प्र.क्र.६/फ-३**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ११ मे, २०१५.

**<u>पहा:-</u>**
१. मुख्य वनसंरक्षक(प्रादेशिक), नाशिक यांचे पत्र क्रं. कक्ष- /जमिन/३७०२/२०१४-१५ दिनांक ९/०१/२०१५
२. व्यवस्थापकीय संचालक, नागपूर यांचे पत्र क्रं. मुमव्य/योजना/पीआरपीओ/ ४८०/अे/ २०१५-१६/ दिनांक ७/५/२०१५
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१४/काआकु/११३/ २०१५-१६दि. ११/०५/२०१५.

**प्रस्तावना:-**

नाशिक शहराच्या दक्षिणेस मुंबई-आग्रा महामार्गा लगत पांडवलेणी या नावाणे ओळखली जाणारी सुंदर कोरीव लेणी आहे. या लेण्यांच्या परिसरात वन विभागाच्या ताब्यात ९३.९६७ हेक्टर राखीव वनक्षेत्र आहे. सदर क्षेत्रापैकी २०.०० हेक्टर हे सपाटीचे व राजमार्गालगत असून उर्वरीत क्षेत्र चढ-उताराचे डोंगराळ आहे. सदरहू क्षेत्रावर सन १९८५ पासून पांडवलेणी वन उद्यानाच्या निर्मितीस प्रारंभ झाला आहे.

नाशिक मौजे पाथर्डी कक्ष क्रमांक २२५ (सर्व्हे नंबर २८४, २८६ ) एकूण क्षेत्र ९३.९६७ हेक्टर या क्षेत्रावर असलेल्या नेहरु उद्यान व संलग्न परिसराचा विकास / व्यवस्थापन नाशिक महानगरपालिका यांच्या सहाय्याने करण्यात येणार आहे. सदर क्षेत्रावर वन उद्यानाचे काळानुरुप पर्यावरणपूरक आधुनिकरण करणे, निसर्ग पर्यटनाच्या दृष्टीने विकास व देखभाल करण्याच्या दृष्टीने वरील क्षेत्र महाराष्ट्र वन विकास महामंडळास हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

वन विभागाच्या ताब्यातील नाशिक मौजे पाथर्डी कक्ष क्रमांक २२५ (सर्व्हे नंबर २८४, २८६ ) एकूण क्षेत्र ९३.९६७ हेक्टर या क्षेत्रावर असलेल्या नेहरु उद्यान व संलग्न परिसराचा विकास / व्यवस्थापन नाशिक महानगरपालिका यांच्या सहाय्याने करण्याकरिता सदरहू क्षेत्र महाराष्ट्र वन विकास महामंडळाकडे हस्तांतरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करीत आहे.

वन विकास महामंडळास हस्तांतरीत करण्यात येत असलेले क्षेत्र खालील प्रमाणे आहे.

| तालुका | गांव | वनाचा प्रकार | कक्ष क्रमांक | सर्व्हे क्रमांक | क्षेत्र (हेक्टर) |
|---|---|---|---|---|---|
| नाशिक | पाथर्डी | राखीव वन | २२५ | २८४ | १५.१९५ |
| नाशिक | पाथर्डी | राखीव वन | २२५ | २८६ | ७८.७७२ |
| | | | | एकूण क्षेत्र (हेक्टर) | ९३.९६७ |

सदरहू क्षेत्र महाराष्ट्र वन विकास महामंडळास हस्तांतरीत करण्याची कार्यवाही त्वरीत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्याwww.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०१५०५१२१४३०३१४९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: CN = TIWARI VIRENDRA RAMBAHAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST,CID - 917243
Date: 2015.05.12 14:32:11 +05'30'

(वीरेंद्र तिवारी)
मुख्य वनसंरक्षक(मंत्रालय)
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य नागपूर.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. महाव्यवस्थापक, एफडीसीएम लि., नाशिक प्रदेश, नाशिक.
६. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक),नाशिक.
७. उपवनसंरक्षक (प्रादेशिक) पश्चिम नाशिक विभाग, नाशिक.
८. विभागीय व्यवस्थापक, , एफडीसीएम लि., वन प्रकल्प विभाग, पश्चिम नाशिक.
९. कार्यासन अधिकारी, फ-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.फ-३ कार्यासन निवड नस्ती.